"निधी व्यस्थापन समितीवरील
सदस्यांचे सदस्यत्व" रद्द करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ग्राकस-२०२०/प्र.क्र.१ (निधी)/ग्रा.सं-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
दि. ०३ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ:-**१) शासन निर्णय क्र.ग्राकनी-१६१५/प्र.क्र.१०३/ग्रासं-२, दिनांक १ डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्राहकांमध्ये जनजागृती करण्यासाठी राज्यात विविध कार्यक्रम आयोजीत केले जातात. लोकांमध्ये ग्राहक चळवळीचा प्रचार व प्रसार करण्याच्या दृष्टिकोनातून पोस्टर्स लावणे, चर्चासत्र/कार्यशाळा आयोजित करणे, पथनाट्य, भारूडे, लोकनृत्य सादर करणे इ. साठी शासनाकडुन अनुदान उपलब्ध करून देण्यात येते. या खर्चाचे नियोजन करण्यासाठी शासन स्तरावर मा.प्रधान सचिव (अनापुअग्रासं) यांच्या अध्यक्षतेखाली निधी व्यवस्थापन समितीची स्थापना करण्यात आली आहे. या समितीवर २ अशासकीय सदस्य आहेत. या दोन अशासकीय सदस्यांची नियुक्ती संदर्भाधीन शासन निर्णय दि. ०१/१२/२०१८ अन्वये करण्यात आली होती.

मा. मुख्य सचिवांच्या दि.३/१/२०२० च्या टिप्पणीच्या अनुषंगाने प्रत्येक प्रशासकीय विभागांतर्गत विविध कायदे/अधिनियम/नियमाद्वारे स्थापित केलेली शासकीय/अशासकीय मंडळे व समित्या यावर नियुक्त केलेल्या सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करुन, नव्याने मंडळे व समित्यांचे पुनर्गठन करण्याबाबत सूचना देण्यात आल्या, त्यानुसार निधी व्यवस्थापन समितीवरील सदस्यांचे सदस्यत्व रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात या विभागाच्या दि. ०१ डिसेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निधी व्यवस्थापन समितीवर नियुक्त करण्यात आलेल्या खालील सदस्यांचे या समितीवरील सदस्यत्व रद्द करण्यात येत आहे.

| अनु. क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. जोशी ओंकार सितारामपंत | सदस्य |
| २ | श्री. पुरूषोत्तम सांभ अमिलकंठवार | सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२०३१५०७३५०९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Manikrao Suryawanshi



**( मनोजकुमार सुर्यवंशी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद,
५) सर्व मंत्रालयीन विभाग,
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व जिल्हाधिकारी,
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
९) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई,
१०) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
११) सर्व उपायुक्त (पुरवठा),
१२) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१३) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
१४) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
१५) मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
१६) सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१७) सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१८) सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई,
१९) सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई,
२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२१) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई,
२२) सर्व विधानपरिषद सदस्य व विधानसभा सदस्य,
२३) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
२४) श्री. जोशी ओंकार सितारामपंत,१० बी, ग्रीन पार्क अपार्टमेंट, क्रांती चौक, उस्मानपुरा, औरंगाबाद-५,
२५) श्री. पुरूषोत्तम सांभ अमिलकंठवार, सरस्वती सदन, रंगारी गल्ली, गणपती मंदिराजवळ, नांदेड,
२६) निवडनस्ती (कार्यासन ग्रासं-२).